अग्निशमन आपत्कालिन सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा योजनेअंतर्गत वडवणी नगरपंचायत, जि. बीड करिता अनुदान वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- अशसं २०१७/प्र.क्र. ५ / नवि-२०**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : ३१ मार्च, २०१७.**

वाचा :- १) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. अशास-१४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२०, दि. ३१.०८.२००९.
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२७/नवि-२०, दि. १२.०८.२०१६
३) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. मअसे/ ३२-क/ २०१६ / १५९४, दि.१९.११.२०१६
४) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. मअसे/ ३२-क/ २०१७ / ३६१, दि. ०८.०३.२०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका / नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरुन काढण्यासाकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने दिनांक ३१ ऑगस्ट २००९ रोजी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या सूत्राप्रमाणे ("ड" वर्ग महानगरपालिकांसाठी ३५% शासन हिस्सा, "अ" वर्ग नगरपरिषदांसाठी ५०% शासन हिस्सा, "ब" वर्ग नगरपरिषदांसाठी ७०% शासन हिस्सा, तसेच "क" वर्ग नगरपरिषदांसाठी ८०% शासन हिस्सा संबंधित नगरपरिषदेचा हिस्सा) अनुदान देण्यासाठी संबंधित नगरपरिषदांकडून प्राप्त सविस्तर प्रकल्प अहवालांच्या छाननीअंती अनुदान वितरीत करण्यांत येते. शासन निर्णय, नगर विकास विभाग, दि. १२.०८.२०१६ अन्वये महाराष्ट्र अग्नि सुरक्षा अभियान नव्याने निर्माण झालेल्या / होणाऱ्या ड-वर्ग महानगरपालिका, नगरपरिषदा तसेच नगरपंचायती मध्ये राबविण्याचा निर्णय घेतला आहे. आता उपरोक्त संदर्भ क्र. (३) व (४) येथील संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांनी प्रस्तावित केल्यानुसार वडवणी नगरपंचायत, जि. बीड यांना त्यांच्या हिश्श्याची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांनी संदर्भांकीत पत्रान्वये महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान प्राथम्य क्र. १ अंतर्गत वडवणी नगरपंचायत, जि. बीड करिता अग्निशमन केंद्र व अग्निशमन वाहनाकरिता निधी मंजूर करण्याबाबत प्रस्ताव सादर केलेला आहे.

२. महाराष्ट्र अग्नि सुरक्षा अभियानांतर्गत मुख्याधिकारी, वडवणी नगरपंचायत, जि. बीड यांनी अग्निशमन केंद्रास मान्यता मिळण्याबाबत रू. ६९.९० लक्ष इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक सादर केले आहे.

३. उपरोक्त अंदाजपत्रकाची सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासणी केली. त्यानुसार रू. ६९.९० लक्ष इतक्या रक्कमेस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

(अ) सदरील काम जर अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास त्यात ५ टक्के सेंटेंज चार्जेसची तरतूद मिळविण्यात यावी.

(ब) सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करत असताना सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. बीडीजी २०१४/प्र.क्र.९६/इमा.३, दिनांक ०८.०७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(क) प्रस्तुत कामाचा आराखडा व नकाशे तयार करुन त्यास शासकीय वास्तुविशारदांकडून मंजूर करुन घेण्यात यावा तसेच त्यावर व अंदाजपत्रकावर उपभोक्ता विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांची स्वाक्षरी घेण्यात यावी.

(ड) काम सुरू करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

(इ) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे. त्याचबरोबर अंदाजपत्रकातील काही बाबींसाठी दरसुचीबाह्य दर वापरण्यात आलेल आहेत. तथापि या बाबींसाठी आवश्यक असणारी दरपृथकरणे तयार करुन त्यास अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, चंद्रपूर यांची मंजूरी घेणे आवश्यक आहे.

(ई) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानातील प्राथम्य क्र.१ मध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या वडवणी नगरपंचायत, जि. बीड करीता १ अग्निशमन केंद्र व १ अग्निशमन वाहने याकरिता एकूण रू.८० लक्ष इतका खर्च अनुज्ञेय आहे. त्यापैकी शासन अनुदानाची रक्कम रू. ६४,००,०००/- (रूपये चौसष्ठ लक्ष फक्त) इतकी रक्कम अग्निशमन केंद्र बांधण्याकरीता व १ अग्निशमन वाहन खरेदी करण्याकरीता तसेच सदर निधीचा विनियोग पूर्णत: झाल्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर करण्यात येत आहे. सदर अग्निशमन वाहनांची खरेदी संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांच्या स्तरावर शासन मान्यतेने निश्चित दर कराराप्रमाणे करण्यात यावी.

५. या खर्चाचे देयक काढण्यासाठी संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आले असून, त्यांनी सदर रक्कमेचा धनादेश मुख्याधिकारी, वडवणी नगरपंचायत, जि. बीड यांच्या नावे काढावा.

६. सदर कामासाठी येणारा खर्च शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. बीयुडी १८१६/प्र.क्र.२१/नवि-४, दिनांक १७.०२.२०१६ अन्वये "एफ-२, २२१७, नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (५३) राज्यातील नगरपरिषदांना अग्निशमन सेवा व आणीबाणीच्या सेवांच्या बळकटीकरणासाठी सहाय (२२१७ ३२१५) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या सन २०१६-१७ च्या मंजूर अनुदानामधून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७९/१७/इमा-३, दिनांक २१.०३.२०१७ व शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार विनियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०३३१११०५३६१३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.31 11:08:55 +05'30'

**(ज.ना पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
११) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१२) संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रुझ (पुर्व), मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी मुख्याधिकारी, वडवणी नगरपंचायत, जि. बीड यांना वितरित करुन अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

१३) मुख्याधिकारी, वडवणी नगरपंचायत, जि. बीड
१४) कक्ष अधिकारी (व्यय-३) / (अथसंकल्प-१६), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई
१५) कक्ष अधिकारी (नवि-४)/(नवि-२९)/(नवि-३१), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
१६) निवडनस्ती, (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.